**पुनर्वसन अधिनियम १९७६,१९८६,११९९ नुसार पात्र प्रकल्पबाधित व्यक्तींच्या पर्यायी जमिन, रहिवासी प्रयोजानार्थ पुनर्वसित गावठाणामध्ये भुखंड यासंदर्भात केलेल्या तक्रारींचे निराकारण करण्यासाठी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गाऱ्हाणी निराकरण समितीचे गठन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. आरपीए-२०१९/प्र.क्र.१२१/र-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० जानेवारी, २०२०.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम - १९७६,१९८६,१९९९ नुसार पात्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसनविषयक तक्रारींचे निराकरण करण्यासाठी जिल्हास्तरावर यंत्रणा निर्माण करणे आवश्यक आहे. प्रकल्पबाधित व्यक्तीं थेट मा.उच्च न्यायालयात पर्यायी जमिन, पुनर्वसित गावठाणामध्ये रहिवासी प्रयोजानार्थ भुखंड या पुनर्वसनविषयक मागण्याबाबत तसेच प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन सुयोग्य रितीने झाले नाही, असा मुद्दा उपस्थित करून जमिन वाटपासाठी प्रकल्पग्रस्तांकडून मा. उच्च न्यायालय रिट याचिका मोठ्या प्रमाणात दाखल केल्या जातात. मा. उच्च न्यायालयात अशा याचिका दाखल करतेवेळी याचिका कर्त्याने कोणतीही आवश्यक कागदपत्र सादर केलेले नसतात अथवा ज्या आदेशास आव्हानीत करावयाचे आहे असे कोणतेही आदेश अस्तीत्वात नसतात. त्यामुळे मा. उच्च न्यायालयास देखील प्रकरणांची तपासणी करण्यास अडचणी निर्माण होतात. त्यानुसार महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम - १९७६, १९८६, १९९९ नुसार पात्र प्रकल्पबाधित व्यक्तींच्या पुनर्वसन विषयक तक्रारींचे निराकरण करण्यासाठी पुढीलप्रमाणे धोरणात्मक निर्णय घेण्यात येत आहेत.

**शासन निर्णय :-**

पुनर्वसन अधिनियम १९७६, १९८६, ११९९ नुसार पात्र प्रकल्पबाधित व्यक्तींच्या पर्यायी जमिन, रहिवासी प्रयोजानार्थ पुनर्वसित गावठाणामध्ये भुखंड यासंदर्भात केलेल्या तक्रारींचे निराकारण करण्यासाठी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली "गाऱ्हाणी निराकरण समिती" स्थापन करण्यात येत आहे.

**सदर समितीची रचना खालील प्रमाणे असेल :-**

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी : | अध्यक्ष |
| २) | अतिरिक्त जिल्हाधिकारी (पुनर्वसन) : | सदस्य |
| ३) | उप जिल्हाधिकारी (पुनर्वसन) : | सदस्य सचिव |
| ४) | संबंधित प्रकल्पाचे काम पाहणारे कार्यकारी अभियंता : | सदस्य |
| ५) | या व्यतीरिक्त अध्यक्षांना आवश्यक वाटलेल्या अशा अधिकारी / कर्मचारी यांना सदस्य म्हणून नामनिर्देशीत करता येईल. | |

**कार्यक्षेत्र :-** जिल्ह्यातील पुनर्वसन अधिनियमानुसार अधिसुचित झालेल्या प्रकल्पांतर्गत बाधित झालेल्या व्यक्तींनी "पर्यायी जमिन" व "रहिवासी प्रयोजनार्थ पुनर्वसित गावठाणात भूखंड" या संबंधी केलेल्या तक्रारीची दखल सदर समिती घेईल.

**कार्यपध्दती :-**

१. जिल्हा पुनर्वसन अधिकारी तथा सदस्य सचिव "पर्यायी जमिन" व "रहिवासी प्रयोजनार्थ पुनर्वसित गावठाणात भूखंड" या उपरोक्त मुद्द्यांबाबत प्राप्त तक्रारीची छाननी करून आपल्या अभिप्रायासह अध्यक्षांना प्रकरण सादर करतील.

२. समितीची बैठक महिन्याच्या प्रत्येक पहिल्या सोमवारी घेण्यात येईल. सोमवारी सुट्टी असल्यास त्या पुढील कामाच्या दिवशी बैठक घेण्यात येईल.

३. समितीचे कामकाज सुयोग्य पध्दतीने करण्यासाठी जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष यांना आपल्या शक्ती आवश्यकतेनुसार अपर जिल्हाधिकारी (पुनर्वसन) यांना प्रत्यार्पीत करता येतील.

४. "पर्यायी जमिन" व "रहिवासी प्रयोजनार्थ पुनर्वसित गावठाणात भूखंड" या संदर्भात प्रकल्पग्रस्तांच्या मागणीबाबत त्यांना समितीसमोर बाजु मांडण्याची संधी देण्यात यावी.

५. समितीने कागदपत्र तपासणी करुन आपले यथोचित निर्णय सुयोग्य कारणमिमांसेसह अर्जदारास सुनावणी पासून दोन महिन्याच्या आत कळविणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत आहे. त्याचा संकेतांक २०२००१२०१६०९५८४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sandeep Prabhakar Kadam

Digitally signed by Sandeep Prabhakar Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de6d1d9fefa1eb37509fcc5fd07e0b3af4486320f7a793a b4ca8cbdf69c22cce, serialNumber=301b85c4e710923640c995342ca907a5457d5a2c3 498260fb74e64b726578c6c, cn=Sandeep Prabhakar Kadam
Date: 2020.01.20 16:11:17 +05'30'

**( संदिप प्र. कदम )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. राज्यमंत्री (म. व पु.) यांचे खाजगी सचिव,
५) सचिव ( मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
६) सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
८) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर,
९) सर्व विभागीय आयुक्त,
१०) सर्व जिल्हाधिकारी, सर्व अतिरिक्त जिल्हाधिकारी (पुनर्वसन)
११) सर्व जिल्हा पुनर्वसन अधिकारी,
१२) सर्व कार्यासने (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) निवड नस्ती, कार्यासन र-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय. मुंबई.